**प्रधानमंत्री आवास योजनेच्या (शहरी) घटक क्र.०४ आर्थिकदृष्ट्या दुर्बल घकांसाठी (BLC) एकाच कुटुंबातील एकापेक्षा जास्त लाभार्थींना सामाईक जागेवर बहुमजली इमारत बांधण्यास परवानगी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : प्रआयो-२०२०/प्र.क्र.१२०/गृनिधो-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०३ मार्च, २०२३

**वाचा :** केंद्रिय मान्यता व सनियंत्रण समितीची दिनांक २२.१.२०२० रोजी झालेल्या ५० व्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाने प्रधानमंत्री आवास योजना (शहरी) संदर्भात मार्गदर्शक सूचना निर्गमित केलेल्या आहेत. कुटुंब हा या योजनेचा घटक असल्याने कुटुंबाची व्याख्याही नमूद करण्यात आली आहे. या योजनेतील घटक क्र.४ अंतर्गत आर्थिक दृष्ट्या दुर्बल घटकातील लाभार्थ्यांना स्वत:च्या मालकीच्या जागेवर घरकुल बांधण्यासाठी अनुदान दिले जाते. त्यामध्ये केंद्र शासनाने दिनांक ०५.०१.२०१९ रोजी सुधारणा केली असून, त्यानुसार प्रधानमंत्री आवास योजना (शहरी) अंतर्गत पात्र कुटुंबातील सज्ञान कमावता व्यक्ती हा प्रधानमंत्री आवास योजनेतील घरकुलासाठी पात्र ठरविण्यात आला आहे.

अशा परिस्थितीत, एकत्र कुटुंब पद्धतीमुळे कुटुंब प्रमुखाच्या नावावरच संपूर्ण जागा असल्याने कुटुंबातील इतर पात्र लाभार्थ्यांना नावावर जागा नसल्यामुळे प्रधानमंत्री आवास योजना(शहरी) चा लाभ घेता येत नसल्याचे निर्दशनास आले आहे. एकाच कुटुंबातील परंतु सामाईक जागा असलेल्या लाभार्थ्यांना केंद्र शासनाच्या धोरणानुसार प्रधानमंत्री आवास योजना(शहरी) अंतर्गत बहुमजली बांधकाम करण्यास परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

केंद्र शासनाच्या केंद्रीय मान्यता व संनियंत्रण समिती (CSMC)च्या ५० व्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार प्रधानमंत्री आवास योजना (शहरी) च्या घटक क्र.४ (BLC) मध्ये एकाच कुटुंबात एकापेक्षा जास्त प्रधानमंत्री आवास योजना (शहरी)चे लाभार्थी असल्यास व त्यांची जागा सामाईक असल्यास, अशा पात्र लाभार्थ्यांना प्रधानमंत्री आवास योजना (शहरी) चा लाभ घेणे शक्य व्हावे यासाठी त्यांना सामाईक जागेवर प्रधानमंत्री आवास योजना (शहरी) अंतर्गत बहुमजली इमारत बांधण्यास यान्वये परवानगी देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३०३१६०१५३११०९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by RAJU GULABRAO AMBADEKAR
Date: 2023.03.03 16:06:44 +05'30'

(राजु अंबाडेकर)
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन,(पत्राने)
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा. उप मुख्यमंत्री महोदय, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय मुंबई-२.

४. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, म.वि.स., विधानभवन, मुंबई.
५. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, म.वि.स., विधानभवन, मुंबई.
६. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई-३२.
७. प्रधान सचिव(नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण,गृहनिर्माण भवन,वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
९. महानगर आयुक्त, एमएमआरडीए,मुंबई/ एनएमआरडीए,पुणे/ एनएमआरडीए, नागपूर
१०. व्यवस्थापकीय संचालक, सिडको, बेलापूर, नवी मुंबई.
११. सर्व विभागीय आयुक्त.
१२. सर्व जिल्हाधिकारी.
१३. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद संचालनालय, नवी मुंबई.
१४. सर्व अंमलबजावणी यंत्रणांना.
१५. निवडनस्ती /गृनिधो-२ कार्यासन, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.